**क्षेत्रिय कार्यालयातील पुरवठा विभागातील कर्मचाऱ्यांची बिंदुनामावली व आस्थापना स्वतंत्र ठेवणे.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः निशिका-२११८/प्र.क्र.१०५/ना.पु.१५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई
तारीख: ०२ नोव्हेंबर, २०१८.

## शासन परिपत्रक

राज्य शासनाच्या अन्य विभागांप्रमाणेच अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग हा स्वतंत्र विभाग आहे. या विभागाकडून राज्यातील पुरवठा विषयक कामकाज हाताळले जाते. यासाठी विभागाची क्षेत्रिय स्तरावर स्वतंत्र यंत्रणा आहे. या विभागाचा स्वतंत्र आकृतीबंध दिनांक २६ जून, २००३ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेला आहे. या विभागातील पदांचे सेवाप्रवेश नियमदेखिल स्वतंत्र आहेत.

२. शासनाच्या असे निदर्शनास आलेले आहे की, जिल्हा आणि विभाग स्तरावर पुरवठा यंत्रणेतील आकृतीबंधातील जी पदे निर्माण केलेली आहेत, ती सर्व पदे पुरवठा विभागाच्या आस्थापनेवर स्वतंत्रपणे न दाखवता जिल्हाधिकारी आणि विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेवर दर्शविण्यात येतात आणि ती महसूल आस्थापनेवर आहेत, असे समजण्यात येते. वस्तुत: हा समज पूर्णत: चुकीचा आहे.

३. वर नमूद केल्याप्रमाणे पुरवठा विभागाचा स्वतंत्र आकृतीबंध आहे. पुरवठा विभागातील पदांचे स्वत:चे असे स्वतंत्र सेवाप्रवेश नियम आहेत. त्यामुळे जिल्हा स्तरावर पुरवठा विभागाची जी पदे आहेत, ती महसूल विभागाची नसून पुरवठा विभागाची आहेत. सदर वस्तुस्थिती विचारात घेता, पुरवठा विभागाच्या पदांची आस्थापना स्वतंत्ररित्या समजण्यात यावी आणि जिल्हाधिकारी तसेच विभागीय आयुक्त कार्यालयामधील पुरवठा विभागातील गट-क व गट-ड पदांचा आकृतीबंध व बिंदुनियमावली स्वतंत्रपणे ठेवण्यात यावीत.

४. सदर कार्यवाही एक महिन्याच्या आत पूर्ण करावी आणि त्याचा अहवाल शासनास न चुकता सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या  या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०२१६४५४४६९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food and Civil Supply, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2018.11.02 16:52:23 +05'30'

**( स.श्री.सुपे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व विभागीय आयुक्त,
२. सर्व उपायुक्त (पुरवठा),
३. सर्व जिल्हाधिकारी,
४. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
५. निवडनस्ती नापु-१५.